**महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेखाली सैन्यातील शौर्यपदक/सेवापदक धारकांना अनुदान - लेफ्टनंट जनरल सुरेंद्र हरी कुलकर्णी, जि.पुणे.**

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग

शासन निर्णय क्र.मगौपु-२०१४/(प्र.क्र.३००/१४)/२८

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : ०९/०१/२०१५.

**<u>वाचा</u>**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. शौपपु-२०००/३०३/प्र.क्र.३१(२०००)/२८, दि.०३.०७.२०००.

२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. शौपपु-२००१/२८९८/प्र.क्र.१६(२००२)/२८, दि.१६.०८.२००२.

३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. शौपपु-२००८/प्र.क्र.४९/२८, दि.०७.०५.२०११.

४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. शौपपु-२००५/४७८/प्र.क्र.११६/२००५/२८, दि.१५.१२.२००५.

५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. मगौपु-२०१३/१३३५/(प्र.क्र.३८२/१३)/२८, दि.३०.११.२०१३.

६) संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांची पत्रे क्र.१६२११/गौ.पु/प्रस्ताव/सैकवि-१६/३१९८, दिनांक ०८.०८.२०१४ व क्र. १६२११/गौ.पु/प्रस्ताव/सैकवि-१६/४९४९, दिनांक १७.१२.२०१४.

**<u>प्रस्तावना</u>**

संदर्भाधीन दिनांक ०३.०७.२००० च्या शासन निर्णयाद्वारे महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेंतर्गत सैन्यातील १४ प्रकारच्या शौर्यपदक/सेवापदक धारकांना शासकीय अनुदान देण्याचा व दिनांक

१६.०८.२००२ च्या शासन निर्णयाद्वारे ज्या शौर्य/सेवा पदक धारकांना गौरव पुरस्कार योजनेखाली अनुदान देण्यात आले आहे, अशा अधिकारी/जवानास भविष्यात त्याहीपेक्षा श्रेष्ठ शौर्य/सेवा पदक प्राप्त झाल्यास, श्रेष्ठ शौर्य/सेवा पदकाप्रित्यर्थ अनुज्ञेय रक्कम व त्यापुर्वी देण्यात आलेली रक्कम यातील फरक अदा करण्याचा तसेच दिनांक ०७.०५.२०११ च्या शासन निर्णयाद्वारे सुधारीत दराने अनुदान देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. आयसी- ३१५२१ पी, लेफ्टनंट जनरल सुरेंद्र हरी कुलकर्णी यांना क्र. ७-प्रेस/२०१४, दिनांक २६ जानेवारी, २०१४ च्या राष्ट्रपती सचिवालयाच्या अधिसूचनेन्वये "परम विशिष्ट सेवा पदक" प्रदान करण्यात आले आहे. सदर लाभार्थ्यास यापुर्वी शासन निर्णय सा.प्र.वि., क्र.शौपपु-२००५/४७८/प्र.क्र.११६/२००५/२८, दिनांक १५.१२.२००५ अन्वये विशिष्ट सेवा पदकाप्रित्यर्थ रक्कम रु.२३,०००/- व शासन निर्णय सा.प्र.वि., क्र.मगौपु-२०१३/१३३५/(प्र.क्र.३८२/१३)/२८, दिनांक ३०.११.२०१३ अन्वये अति विशिष्ट सेवा पदकाप्रित्यर्थ रक्कम रु.६२,०००/- असे एकूण रु.८५,०००/- इतके अदा करण्यात आलेले आहेत. संदर्भाधिन दिनांक १६.०८.२००२ व दिनांक ०७.०५.२०११ च्या शासन निर्णयांतील तरतूदींनुसार परम विशिष्ट सेवा पदकाप्रित्यर्थ देण्यात येणारी रक्कम रु.१,७०,०००/- यामधून, यापूर्वी अदा करण्यात आलेल्या विशिष्ट सेवा पदक व अति विशिष्ट सेवा पदकांप्रित्यर्थ अनुक्रमे रु.२३,०००/- व रु.६२,०००/- असे एकूण रु.८५,०००/- वजा जाता, रुपये ८५,०००/- इतके या योजनेंतर्गत त्यांना एकरकमी अनुदान देण्याबाबतचा प्रस्ताव संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांच्या वरील संदर्भाधीन दिनांक ०८.०८.२०१४ च्या पत्रान्वये शासनास प्राप्त झाला असल्याने तद्रुषंगाने अनुज्ञेय रक्कम लाभार्थ्यांस मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय</u>**

उपरोक्त नमूद शासन निर्णय व प्रस्तावाच्या अनुषंगाने खालील तक्त्यात दर्शवल्याप्रमाणे महाराष्ट्र गौरव पुरस्कार योजनेखाली अनुज्ञेय असलेली रु.८५,०००/- (रुपये पंच्याऐंशी हजार फक्त) इतकी अनुदानाची रक्कम देण्यास शासनाची मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

| अ. क्र. | शौर्य/सेवापदक धारकाचे पदनाम, नाव व पत्ता | शौर्य/सेवापदक | पदक प्राप्त झाल्याचा दिनांक | अनुदानाची देय एकूण रोख रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १ | आयसी-३१५२१ पी, लेफ्टनंट जनरल सुरेंद्र हरी कुलकर्णी, ७५, सहवास को-ऑपरेटिव्ह हाऊसिंग सोसायटी, कर्वे नगर, पुणे ४११ ०५२. | परम विशिष्ट सेवा पदक | २६.०१.२०१४ | ८५,०००/- |
| | | | एकूण | ८५,०००/- |

२. या प्रयोजनार्थ होणारा रुपये ८५,०००/- (रुपये पंच्याऐंशी हजार फक्त) इतका खर्च 'मागणी क्र.ए-४, लेखाशिर्ष २०७५, संकीर्ण सर्वसाधारण सेवा, ८०० - इतर खर्च, (००)(०५) शौर्यासाठी पारितोषिके (२०७५ ०११३) ०५ - बक्षिसे' या लेखाशीर्षाखाली सन २०१४-२०१५ या वित्तीय वर्षाकरीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीमधून भागविण्यात यावा. तसेच सदरचा खर्च हा मासिक निधी विवरणपत्रानुसार करण्याची दक्षता घेण्यात यावी. प्रस्तुत प्रकरणी 'आहरण व संवितरण अधिकारी', म्हणून जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे यांनी याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. शौपपु-२००१/२८९८/प्र.क्र.१६(२००२)/२८, दि.१६.०८.२००२ व शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. शौपपु-२००८/प्र.क्र.४९/२८, दि.०७.०५.२०११ मधील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१५०११७१७०४३५२७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradeep Darade

Digitally signed by Pradeep Darade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pradeep Darade
Date: 2015.01.17 17:12:54 +05'30'

**प्र.ल.दराडे**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

३. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई-३२,

४. कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,

५. जिल्हाधिकारी, पुणे,

६. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,

७. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००६ ( ५ प्रती),

८. जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, जिल्हा सैनिक कल्याण कार्यालय, पुणे,

९. सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई ३२,

१०. आयसी-३१५२१ पी, लेफ्टनंट जनरल सुरेंद्र हरी कुलकर्णी, ७५, सहवास को-ऑपरेटिव्ह हाऊसिंग सोसायटी, कर्वे नगर, पुणे ४११ ०५२.

११. निवड नस्ती (२ प्रती),